इसाकला स्वप्नात एका आवाजाने तीनवेळा बजावलं. “राजधानीत जा. राजमहालाजवळील पुलाखाली खजिना शोध.”

आधी इसाकला हा मुर्खपणा वाटला.

मग आपलं स्वप्न खरं की खोटं?

हे पडताळून बघण्यासाठी तो राजधानीकडे निघाला.

त्यासाठी इसाकला मोठा पल्ला पार करावा लागला. इसाकची ही यात्रा त्याला कुठं घेऊन गेली? त्याला तिथं काय सापडलं? ही जुनी पण रोमांचक गोष्ट तुम्हाला खूप खूप आवडेल.



# खजिना

उरी. मराठी : फारूक एस.काझी

कोणे एके काळी एक माणूस राहायचा.
इसाक त्याचे नाव.

तो अत्यंत गरीब होता.

कित्येकदा त्याला उपाशी पोटी झोपावं लागे.

एका रात्री त्याला स्वप्न पडलं.



स्वप्नात एका आवाजाने त्याला सांगितलं – राजधानीत जा. तिथं राजमहालाशेजारी पुलाखाली खजिना शोध. "हे तर एक स्वप्नंच आहे. स्वप्नं कुठं खरी होतात काय?" उठल्यावर त्याच्या डोक्यात हाच विचार येई. आणि तो स्वप्न विसरून गेला.

पण, दुसऱ्यांदाही त्याला तेच स्वप्न पडलं.
इसाकने त्याकडे पुन्हा दुर्लक्ष केलं.



तिसऱ्यांदाही त्याला तेच स्वप्न पडलं तेव्हा इसाकला वाटलं "हे स्वप्न खरं असावं. नाहीतर हे पुनः पुन्हा का बरं पडलं असतं?" आणि त्यानंतर त्याने आपला प्रवास सुरु केला.



अधून मधून कुणीतरी त्याला लिफ्ट देई. पण, त्याला जास्तीत जास्त प्रवास पायीच करावा लागला.



त्याला जंगलातून जावं लागलं.



त्याने डोंगर पार केले.



अखेरीस तो राजधानीत पोचला.

तो राजमहालाजवळ गेला.
राजमहालाजवळचा पूल पाहताना त्याच्या लक्षात आलं,
तिथं सैनिकांचा चोवीस तास पहारा आहे.

सैनिकांचा पहारा पाहून खजिना शोधण्याची हिम्मत त्याने केली नाही.

तरीही तो रोज सकाळी पुलावर जाई आणि संध्याकाळपर्यंत पुलाच्या आसपासच भटकत राही.



एक दिवस सैनिकांच्या कप्तानने इसाकला हटकलंच आणि विचारलं, “तू इथं रोज रोज का येत असतोस?”



इसाकने कप्तानाला आपल्या स्वप्नाविषयी सांगितलं.
कप्तान इसकचं बोलणं ऐकून हसू लागला.



"किती मजाय बघ, तुझ्यासारख्या दरिद्री माणसाने खजिन्याच्या नादात एवढी पायपीट केली." हसून कप्तान खिजवत बोलला," मलाही एक स्वप्न पडलं होतं. त्यात मला तुझ्या शहरात ,इसाक नावाच्या माणसाच्या चुलीखाली खजिना सापडला. हा हा हा ....."

कप्तान खूप मोठ्याने हसला.

इसाकने कप्तानाला लवून सलाम केला आणि तो आपल्या घरी परत जायला निघाला.



त्याने डोंगर पार केले.



तो जंगलं पार करून गेला.



कधी कधी कुणी त्याला लिफ्ट दिली.

पण त्याला जास्तीत जास्त प्रवास पायीच करावा लागला.



शेवटी तो आपल्या शहरात परत आला.



आपल्या घरी येताच त्याने चुलीखाली खोदून पाहिलं.
आणि काय आश्चर्य!!
तिथं त्याला बहुमूल्य खजिना सापडला.



आपल्याला मिळालेल्या खजिन्याच्या बदल्यात आभार मानण्यासाठी त्याने एक प्रार्थना कक्ष बांधला. तिथं एका कोपऱ्यात त्याने पाटी लावली.

त्यावर लिहिलं होतं.....

"अगदी जवळची वस्तू जाणून घ्यायला
कधी कधी आपल्याला खूप दूर दूर जावं लागतं.

इसाकने सैनिकांच्या कप्तानाला अनमोल असं लाल माणिक पाठवून दिलं.

त्याने आपलं उरलेलं आयुष्य शांततेत आणि समाधानात व्यतीत केलं.

नंतर तो कधीच उपाशी पोटी झोपला नाही.

# खजिना

उरी.

मराठी अनुवाद :
फारूक एस.काझी.

आभार : अरविंद गुप्ता

